**मा. सर्वोच्च न्यायालय, मा. उच्च न्यायालय, तसेच इतर प्राधिकरणामध्ये दाखल याचिके संदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : याचिका-२०२०/प्र.क्र.२०५ /ऊर्जा-४**
मंत्रालय (मुख्य इमारत), ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० नोव्हेंबर, २०२०

परिपत्रक :-

महानिर्मिती, महापारेषण व महावितरण कंपनी तसेच महाऊर्जा यांचेशी संबंधित मा. सर्वोच्च न्यायालय, मा. उच्च न्यायालय व इतर प्राधिकरणामध्ये दाखल करण्यात येणाऱ्या बहुतांशी अर्ज/ याचिकांमध्ये प्रधान सचिव (ऊर्जा) यांना प्रतिवादी करण्यात येते. सदरच्या बहुतांश याचिका या संबंधित कंपनीने त्यांच्या स्तरावर किंवा त्यांच्या अधिनस्त कार्यालयांनी घेतलेल्या निर्णयांशी संबंधित असतात. सदर न्यायालयीन प्रकरणांमध्ये कंपनीचे संबंधित अधिकारी कंपनीच्या वकीलांशी संपर्क साधतात. परंतु, सरकारी वकीलांशी संपर्क साधत नाहीत. तसेच शासन प्रतिवादी असल्यामुळे सरकारी वकीलांशी संपर्क करण्याची कंपनीची जबाबदारी नसल्याची भूमिका घेतात. न्यायालयात दाखल झालेल्या अशा बहुतांशी याचिकांमधील विषयामध्ये कंपनीच्या स्तरावर निर्णय झालेले असतात. अशा सर्व प्रकरणांमध्ये याचिकाकर्त्याने शासनास प्रतिवादी केले असेल तर त्याबाबत संबंधितांकडून पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

१) महानिर्मिती, महापारेषण व महावितरण कंपनी तसेच महाऊर्जाच्या संबंधित न्यायालयीन प्रकरणी शासन जर प्रतिवादी असेल तर संबंधित कंपनीच्या अधिकाऱ्यांनी सरकारी वकीलांशी संपर्क साधून आवश्यक ती माहिती द्यावी. तसेच शासनाच्या वतीने न्यायालयामध्ये सादर करावयाच्या शपथ पत्राचे प्रारुप सरकारी वकीलांशी विचार विनिमय करुन शासनास मान्यतेसाठी सादर करावे.

२) प्रस्तुत शपथपत्राच्या प्रारुपास शासनाने मान्यता दिल्यानंतर शासनाने शासनाच्या वतीने प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्याने प्रतिज्ञापत्र न्यायालयात दाखल करावे.

३) संबंधित कंपनीच्या अधिकाऱ्यांनी न्यायालयीत सुनावणीपुर्वी सरकारी वकीलांशी संपर्क साधून त्यांना आवश्यक ती माहिती देऊन उचित कार्यवाही करावी.

४) न्यायालयामध्ये सुनावणीच्या दरम्यान झालेल्या कामकाजाची माहिती तात्काळ शासनास कळवावी.

ऊर्जा विभागातील न्यायालयीन प्रकरणी वरील सूचनानुसार तात्काळ कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२०११२०१२१३००६४१० असा आहे. तसेच सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shraddha Deven Kocharekar

Digitally signed by Shraddha Deven Kocharekar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industries Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, cn=Shraddha Deven Kocharekar
Date: 2020.11.20 12:14:07 +05'30'

**(श्रध्दा कोचरेकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महानिर्मिती कंपनी, प्रकाशगड, वांद्रे-पूर्व, मुंबई-४०००५१
२. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महापारेषण कंपनी, प्रकाशगंगा, वांद्रे-पूर्व, मुंबई-४०००५१
३. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महापारेषण कंपनी, प्रकाशगड, वांद्रे-पूर्व, मुंबई-४०००५१
४. महासंचालक,महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, म्हाडा कर्मशिअल कॉम्लेक्स, पुणे-४११००६
५. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय/ऊर्जा-१, ऊर्जा-२, ऊर्जा-५, ऊर्जा-७
६. निवडनस्ती/ऊर्जा-४